पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवाडी यांच्या मौजे नागनाथनगर, वाळवा, जि.सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. स्मारक- ३११७/प्र.क्र.२२६/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : २२ मार्च, २०२२

वाचा:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३०.०६.२०१८
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक २६.२.२०१९
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३.७.२०१९
४) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.गृह-१/काया-६/पोल-१/स्मारक/आरआर/१९७/२०२०, दिनांक १६.०३.२०२०
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३०.३.२०२०
६) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.जिनिस२०२०/स्मारके/प्र.क्र.०२/का.१४(३)/२०७४, दिनांक.१२.१०.२०२०
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३.११.२०२०
८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक २९.०१.२०२१
९) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३१.०३.२०२१
१०) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दिनांक २४.६.२०२१
११) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दिनांक १४.१०.२०२१
१२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३१.०१.२०२२

**प्रस्तावना:-**

पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवाडी यांच्या मौ. नागनाथनगर, वाळवा, जि. सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरीता शासन निर्णय क्रमांक स्मारक ३११७/ प्र.क्र.२२६/ २९, दिनांक ३०.०६.२०१८ अन्वये रु. १०,३१,००,०००/- इतक्या रकमेच्या आराखडे व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय दिनांक २६.२.२०१९ अन्वये रु.८०,००,०००/-, दिनांक ३.७.२०१९ अन्वये रु. १,५०,००,०००/-, दिनांक ३.११.२०२० अन्वये रु.३४,३२,५००/-, दिनांक २९.१.२०२१ अन्वये रु.१,३७,३०,०००/-, दिनांक ३१.०३.२०२१ अन्वये रु.७५,००,०००/- तसेच दिनांक ३१.०१.२०२२ अन्वये रु. ५५,१३,०००/- याप्रमाणे एकूण रु. ५,३१,७५,०००/- इतका निधी जिल्हाधिकारी, सांगली यांना वितरित करण्यात आला आहे. या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाली आहेत.

संदर्भाधीन अ.क्र. ४ अन्वये जिल्हाधिकारी, सांगली यांनी दिनांक १६.०३.२०२० अन्वये प्रस्तुत स्मारकाच्या बांधकामासाठी (टप्पा-२) रु.८००.०० लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली. त्यास अनुसरुन शासन निर्णय दिनांक ३० मार्च,२०२० अन्वये रु.६०,००,०००/- इतका निधी वितरित करण्यात आला होता. परंतू कोविड-१९ च्या अनुषंगाने वित्त विभागाने बीडीएस वितरण प्रणालीवर निर्बंध आणल्यामुळे जिल्हाधिकारी, सांगली यांना सदर निधी खर्च करता आला नाही, त्यामूळे त्यांचेकडून सदर निधी शासनास समर्पित करण्यात आला. तद्नंतर, दिनांक ३ नोव्हेंबर,२०२० च्या शासन निर्णयान्वये रु. ३४,३२,५००/-, दिनांक २९.१.२०२१ अन्वये रु. १,३७,३०,०००/-, दिनांक ३१.०३.२०२१ अन्वये रु. ७५,००,०००/- व दिनांक ३१.०१.२०२२ अन्वये रु. ५५,१३,०००/- इतका निधी वितरित करण्यात आला.

आता जिल्हाधिकारी, सांगली यांच्या संदर्भाधीन अ.क्र.६ वरील पत्रातील मागणीस अनुसरुन निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

या शासन निर्णयाद्वारे पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवाडी यांच्या मौ. नागनाथनगर, वाळवा, जि. सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता रु.३१,२८,५००/- (रु. एकतीस लक्ष अठ्ठावीस हजार पाचशे फक्त) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक -ए-४,
मुख्य लेखाशीर्ष, २०५९ सार्वजनिक बांधकामे
८०- सर्वसाधारण
८००- इतर खर्च
(००) (००) (०२) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके व पुतळे यांचे बांधकाम (कार्यक्रम)
(२०५९ ३१७७), ५३ मोठी बांधकामे

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र. क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ मधील परि.११ मध्ये नमूद केल्यानुसार ठेव बांधकामाच्या स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग न करता चालू आर्थिक वर्षामध्ये स्मारकाच्या कामासाठी खर्च करण्याची जिल्हाधिकारी, सांगली यांनी दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त निधीमधून खर्च करण्यासाठी जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली ( सांकेतांक क्रमांक २४०१००१०३९ ) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधीच्या खर्चाची, निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल, मुंबई यांना सादर करण्याची तसेच महालेखापालांच्या लेख्यांशी खर्चमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, सांगली यांची राहील.

५. हा शासन निर्णय, प्रशासकीय विभागांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम,भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागांना वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तिय अधिकारांतर्गत असलेल्या प्रकरणांबाबत देण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ सोबतचे परिशिष्ट मधील अ.क्र.९ मधील प्रत्येक मुद्यांची पुर्तता करण्यात आली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२२१७२९१०४२०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JANA JIVA VALVI

Digitally signed by JANA JIVA VALVI
DN: CN = JANA JIVA VALVI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2022.03.22 17:31:46 +05'30'

( ज.जि.वळवी )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
४. मा.पालकमंत्री, जिल्हा सांगली यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (प्र.सु., र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. जिल्हाधिकारी, सांगली.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ नागपूर
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
१३. निवासी उपजिल्हाधिकारी,सांगली
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सांगली
१५. कक्ष अधिकारी (कार्या-२५ / कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय- ४/अर्थसंकल्प-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई .
१८. निवडनस्ती (कार्यासन २९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.